**प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमांतर्गत विद्यार्थ्यांच्या संपादणूक पातळीत वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१८/प्र.क्र.३१५/एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ जानेवारी, २०१९

वाचा :

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२४११/(८०/११)/अर्थसंकल्प, दिनांक २३/९/२०११
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र.शैगुवि-२०१५/(८०/१५)/एसडी-६, दिनांक २२/६/२०१५
३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखसं-२०१४/प्र.क्र.८२/भाग-|||/उद्योग-४, दिनांक १/१२/२०१६
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २/४/२०१८
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांच्याकडील पत्र क्रमांक मप्राशिप/समग्रशिक्षा/गुणवत्ता/२०१८-१९/३३७०, दिनांक २४/१२/२०१८

प्रस्तावना :

बालकांचा मोफत आणि सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ ची राज्यात एप्रिल २०१० पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. राज्यातील ६ ते १४ वयोगटातील प्रत्येक मुलास गुणवत्तापुर्ण शिक्षण प्राप्त करण्याचा अधिकार प्राप्त झालेला आहे. विविध सर्वेक्षण अहवालात सातत्याने मुलांच्या शैक्षणिक गुणवत्तेत घसरण होत असल्याचे दिसून आले. त्याअनुषंगाने राज्यात दिनांक २२ जून, २०१५ च्या शासन निर्णयानूसार “प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र” कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु करण्यात आली. मुलांच्या शैक्षणिक गुणवत्तेत वाढ करण्यासाठी वर्गातील शैक्षणिक वातावरण उत्साही, मुलांना सतत क्रियाशील ठेवणारे असावयास हवे. मुलांना विचार करण्यास चालना देणारी, त्यांची संशोधक वृती जोपासणारी, नाविन्याची माहिती मिळविणे व त्याचा वापर करण्यास प्रवृत्त करणारी, कृतीस वाव मिळवून देणारी विविध संसाधने वर्गात उपलब्ध असावयास हवी. वर्गात फक्त श्रवणावर भर न देता प्रत्यक्ष कृतीच्या माध्यमातून उत्सुकता वाढविण्यास प्रोत्साहन देणाऱ्या आणि विचारास चालना देणाऱ्या उपक्रमाची संधी मुलांना देणे अगत्याचे आहे. जेणेकरून विज्ञान या विषयातील संकल्पनाचे दृढीकरण होण्यास मुलांना मदत होईल, त्यांना स्वनिर्मितीचा आनंद घेता येईल.

मुलांमधील चौकसपणा व सृजनशील कला गुणांना वाव मिळावा, विज्ञान व गणित विषयाची आवड निर्माण व्हावी, ज्या मुलांचा विशेष कल व प्रतिभा या विषयाकडे आहे त्यांना आणखीन प्रोत्साहन देवून अशा संधी उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने भारत सरकारने दि.९ जुलै २०१५ रोजी भूतपूर्व राष्ट्रपती डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम यांच्या हस्ते राष्ट्रीय अविष्कार अभियानाची देशभरात सुरुवात केली आहे.

या कार्यक्रमांतर्गत शाळांमध्ये विज्ञान व गणिताच्या शिक्षणासाठी आवश्यक साहित्य संचासह प्रयोगशाळा, अध्ययन अध्यापन केंद्रे, शैक्षणिक सामुग्री, तंत्रज्ञानाचा वापर या सारखे नाविन्यपुर्ण उपक्रम घ्यावेत असे सूचित करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्यात विद्यार्थ्यांसाठी नाविन्यपुर्ण विज्ञान केंद्र उभारण्याची विविध स्थानिक प्राधिकरणे यांनी मागणी केली आहे. यासाठी आवश्यक आर्थिक तरतूदीचा तपशिल महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे. यासाठी सर्व शिक्षा अभियानांतर्गत राष्ट्रीय आविष्कार अभियान व इतर कार्यक्रमामध्ये निधी उपलब्ध असल्याचे कळविले असून राज्यात सर्व तालुक्यांमध्ये असे विद्यार्थ्यांसाठी विज्ञान केंद्र उभारण्यासाठी अतिरिक्त निधी राज्य शासनाने महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस उपलब्ध करुन देण्यासाठी शासनास संदर्भाधीन पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. यानुसार निवडक शाळांमध्ये नाविन्यपुर्ण विज्ञान केंद्र उभारण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

१. राज्यातील गट/शहर साधन केंद्र अंतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडक शाळांमध्ये विद्यार्थ्यांसाठी नाविन्यपुर्ण विज्ञान केंद्र उभारण्यासाठी रुपये ३२.२४ कोटी इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस उपलब्ध करुन देण्यास सदर आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांच्या स्तरावर, उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील नमूद तरतुदींचे पालन करुन ई-निविदा प्रक्रिया राबवावी. सदरची प्रक्रिया, राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांच्या अध्यक्षतेखाली गठीत खरेदी समितीमार्फत पुर्ण करावी.

३. "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८००-इतर खर्च, (०१)(१०) विद्यार्थ्यांना शैक्षणिक साहित्य पुरविणे (२२०२H६७९), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षातर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित निधीमधून रुपये ३२.२४ कोटी (रुपये बत्तीस कोटी चोविस लाख फक्त) इतक्या निधीचा विनियोग सदर बाबीसाठी करावा.

४. यासाठी सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" आणि अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांना विनियोगाकरीता सदरचा निधी तातडीने त्यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २/४/२०१८ च्या परिपत्रकान्वये असलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मध्ये नमूद अटींची पुर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्रमांक १ ते ७ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. सदरचा निधी खर्च करतांना उद्योग विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. सदरचा निधी दिलेल्या उद्देशासाठीच खर्च करण्यात यावा व सदर निधी चालू आर्थिक वर्षातच खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

६. सदरचा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला उपविभाग-३, अनुक्रमांक-४ परिच्छेद क्र.२७(२)(ब) नुसार आणि वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २/४/२०१८ अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११७१६५७४७७६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Umeshrao Gaikwad

Digitally signed by Santosh Umeshrao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Santosh Umeshrao Gaikwad
Date: 2019.01.17 18:05:01 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहाय्यक
३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
५. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा/परिषद यांचे स्वीय सहाय्यक
६. मा.सदस्य, महाराष्ट्र विधान सभा/परिषद
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, मुंबई
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. संचालक, महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे
१५. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१८. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद सर्व
१९. गटशिक्षणाधिकारी, पंचायत समिती सर्व
२०. स्थानिक निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२१. सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. उपसचिव (एसएम/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. उपसचिव, वित्त / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. अवर सचिव / कक्ष अधिकारी, रोख शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. वित्त विभाग (व्यय-५ / अर्थसंकल्प -८), मंत्रालय, मुंबई
२६. निवडनस्ती, (एसडी-१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई